राज्यातील यंत्रमाग ग्राहकांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (रोखीने) सन २०२१-२२

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. पुरमा-२०२२/प्र.क.१२/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २९ मार्च, २०२२

**संदर्भ** :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दि.०६ एप्रिल, २०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१
३) शासन निर्णय, ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. बीयुडी-२०२१/प्र.क.६१/ऊर्जा-३, दिनांक २५.११.२०२१
४) महावितरण कंपनीचे पत्र क्र. शासन/मागणी/सवलत (GEN)/०११८१०, दि.२५ .०१.२०२२.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थ-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १७ मार्च, २०२२.

**प्रस्तावना** :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार विद्युत वितरण कंपनीला वीज दरात सवलत देण्यात येते व त्याची प्रतिपूर्ती शासनाकडून वितरण कंपनीस केली जाते. वितरण कंपन्यांना यंत्रमाग ग्राहकांना वीज सवलतीसाठी सन २०२१-२२ करिता लेखाशिर्ष २८०१५५८१ खाली अर्थसंकल्पित केलेल्या रु. ६००.०० कोटीमधून रु.५९९.९७१९ कोटी रक्कम रोखीने वितरीत करण्यात आली आहे व पुरवणी मागणीद्वारे जुलै, २०२१ च्या अधिवेशनात समायोजनासाठी मंजूर करण्यात आलेली रु. ३५०.०० कोटीची रक्कम दिनांक २५.११. २०२१ च्या शासन निर्णयान्वये समायोजनाने वितरीत करण्यात आली आहे. आता या बाबीसाठी मार्च, २०२२ च्या अधिवेशनामध्ये रु. ४००.०० कोटी रक्कमेची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे. मार्च, २०२२ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनामध्ये खर्चाचे पुरक विवरणपत्र विधान मंडळास सादर करण्यात आले. दिनांक ३१ मार्च, २०२२ रोजी संपणाऱ्या वित्तिय वर्षाच्या विनियोजनामध्ये समाविष्ट करण्यासाठी, पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिली आहे आणि ते, महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२२ (सन २०२२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक-२३) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक १५ मार्च, २०२२ यामध्ये प्रसिद्ध करण्यात आले आहे. त्यानुषंगाने सदर शासन परिपत्रकातील सुचनांनुसार पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेली रु. ४००.०० कोटी तरतूद ही महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीस रोखीने उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

यंत्रमाग ग्राहकांना वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेली अर्थसहायाची रक्कम रू. ४००.०० कोटी (रुपये चारशे कोटी फक्त) रोखीने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १०४, वीज विकास व्यवस्था राष्ट्रीय भार, (०१) वीज दरात सवलत, (०१) (०२) यंत्रमाग ग्राहकांना वीजदर सवलत (सर्वसाधारण) (२८०१५५८१), (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर निधी ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आला त्याच कारणासाठी खर्च करण्याची दक्षता महावितरण कंपनीने घ्यावी.

४. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी मुंबई यांचेमार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. ना. रा. ढाणे, अवर सचिव (उर्जा-३) आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. ना. श्री. कराड, उप सचिव (उर्जा-३), उद्योग,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रू. ४००.०० कोटी (रुपये चारशे कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांचे नावे स्वतंत्ररीत्या धनादेश काढून/NEFT/RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. यंत्रमाग ग्राहकांना वीज बीलात सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीला निधी वितरीत करतांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१ च्या परिशिष्टातील तपासणी अटीची पूर्तता होत आहे.

६. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ११६/२०२२/व्यय-१६, दिनांक २८.०३.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२२०३२९१७०६१२९९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2022.04.04 17:14:36 +05'30'

**( ना.रा.ढाणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हाँगकाँग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई
२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे मुंबई ४०००५१
३) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, १३ वा मजला, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कुलाबा, मुंबई १
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०
५) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
७) अधिदान व लेखा अधिकारी,रालेवि/अराप, मुंबई ४००००१
८) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे पूर्व, मुंबई ४०००५१
९) उप सचिव (ऊर्जा-५), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई --३२
१०) वित्त विभाग, अर्थसंकल्प-१४, व्यय-१६, मंत्रालय, मुंबई-४०००३२
११) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, ३ रा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर मुंबई.
१२) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.